**वस्त्रोद्योग प्रकल्पांची तपासणी करणेसाठी**
**दक्षता व नियंत्रण पथक गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार ,पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०१/टेक्स-५**
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
दि. ०४ डिसेंबर, २०१९

वाचा -

१) शासन निर्णय ,सपववि क्र. धोरण- २०११/प्र.क्र.३३५/टेक्स-२ दि.२ जानेवारी,२०१२
२) शासन निर्णय ,सपववि क्र. धोरण- २०१७/प्र.क्र.६/टेक्स-५ दि.१५ फेब्रुवारी,२०१८
३) शासन निर्णय ,सपववि क्र. धोरण- २०१९/प्र.क्र.१/टेक्स-५ दि.१६ जानेवारी,२०१९

प्रस्तावना-

महाराष्ट्र राज्याचे वस्त्रोद्योग धोरण २०११-१७ व २०१८-२३ संदर्भ क्र.१ आणी २ येथिल शासन निर्णया अन्वये जाहिर करण्यात आले आहे. या धोरणांतर्गत वस्त्रोद्योग प्रकल्पांना व्याज अनुदान भांडवली अनुदान तसेच वीज अनुदान अशा प्रकारे विविध अनुदान योजना लागू करण्यात आल्या आहेत. या योजनांअंतर्गत अनुदान प्राप्त होणेसाठी वस्त्रोद्योग प्रकल्प तसेच त्यांना अर्थसहाय्य करणा-या बँका शासनास ऑनलाईन अर्ज सादर करतात. यांनी दिलेल्या माहितीच्या आधारे या प्रकल्पांना अनुदान देण्यात येते. तथापी अशा प्रकारे अर्ज केलेल्या काही प्रकल्पांच्या बाबतीत शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, काही वस्त्रोद्योग प्रकल्पांनी अपात्र असतांना अनुदान मागणीसाठी अर्ज केले आहे. अशा प्रकारे चुकिची माहिती बँक तसेच प्रकल्पांमार्फत शासनास सादर केली जात होती, हे विचारात घेऊन वस्त्रोद्योग धोरणा अंतर्गत भांडवली अनुदान व्याज अनुदान तसेच वीज अनुदानाचे घेत असलेल्या प्रकल्पांची पातत्रतेची सखोल तपासणी करण्यासाठी दक्षता व नियंत्रण पथक गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुसार शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे.

शासन निर्णय -

वस्त्रोद्योग धोरण २०११-१७ व २०१८-२३ या धोरणा अंतर्गतच्या योजनांचे लाभ घेत असलेल्या प्रकल्पांची सखोल तपासणी करण्यासाठी सहसचिव / उपसचिव (वस्त्रोद्योग), (टेक्स-५), यांच्या नियंत्रणाखाली खालील प्रमाणे दक्षता व नियंत्रण पथक गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) | सहसचिव / उपसचिव (टेक्स-५) | दक्षता व निरीक्षण पथक नियंत्रक |
| २) | अवर सचिव / कार्यासन अधिकारी (टेक्स-५) | दक्षता व निरीक्षण पथक प्रमुख |
| ३) | सहायक कक्ष अधिकारी (टेक्स-५) | दक्षता व निरीक्षण अधिकारी |
| ४) | लिपीक (टेक्स-५) | दक्षता व निरीक्षण सहायक |

पथकास आवश्यकता भासल्यास संबंधित प्रादेशिक उपआयुक्त कार्यालयातील तांत्रिक कर्मचा-यांच्या सेवा प्रत्यक्ष तपासणीवेळी उपलब्ध करून घेतील.

२. दक्षता व नियंत्रण पथकाने वस्त्रोद्योग धोरणा अंतर्गत लाभ घेत असलेल्या वस्त्रोद्योग प्रकल्पांची सखोल तपासणी करून विविध योजना अंतर्गत खालील प्रमाणे कार्यवाही करावी.

**अ) व्याज अनुदाना ऐवजी भांडवली अनुदान** - या योजनेखाली दक्षता व नियंत्रण पथकाने प्रकल्पाची तपासणी करून मान्यतेचे प्रमाणपत्र द्यावे. सदर प्रमाणपत्र प्राप्त झाल्यावर प्रकल्पाने अनुदान मागणीचे **Form- C, C-1,C-2, C-3,** सादर करतांना सदर मान्यतेचे प्रमाणपत्र ऑनलाईन प्रस्तावात जोडावे. आयुक्त (वस्त्रोद्योग), यांनी सदर प्रमाणपत्रातील माहिती तसेच प्रस्तावातील माहिती तपासावी. तसेच तपासून त्रुटी असल्यास त्रुटीच्या कारणासाह, त्याचप्रमाणे माहिती योग्य असल्यास त्यांच्या शिफारशीसह ३० दिवसांच्या आत प्रस्ताव शासनास सादर करावा.

**आ) अन्य योजना** - (व्याज अनुदान /वीज सवलत व अन्य) या योजनांअतर्गत विहित केलेली कार्यपध्दती तीच राहील. तथापी प्रकल्प योजना अंतर्गत असलेल्या सर्व अटी व शर्तीची तसेच विहित अन्य बाबींची पुर्तता तसेच अन्य नियमांची पुर्तता करीता आहे किंवा कसे याबाबतची सखोल तपासणी दक्षता व नियंत्रण पथाकामार्फत केली जाईल.

२.१) तपासणी अंती योग्य आढळलेल्या प्रकल्पांना वस्त्रोद्योग दक्षता व नियंत्रण पथकामार्फत **पात्रतेचे ना हरकत प्रमाणपत्र** देण्यात येईल. तसेच अपात्र घटकांची मान्यता रद्द करण्यात येईल. जर अशा अपात्र घटकांना यापुर्वी सवलत दिली असेल तर त्याची व्याजासह वसुली करण्यात येईल.

२.२) प्रकल्पास वरील प्रमाणे **पात्रतेचे ना हरकत प्रमाणपत्र** प्राप्त झाल्यावर असा प्रकल्प अनुदान प्राप्तीसाठी पात्र राहील.

३. दक्षता व नियंत्रण पथकामार्फत तपासणी पुर्ण होईपर्यंत वस्त्रोद्योग प्रकल्पांचे सद्यस्थीतीत सुरू असलेले लाभ सूरू राहतील. तथापी प्रकल्पाची तपासणी केल्यावर पथकास जर प्रकल्पाची माहिती चुकीची किंवा खोटी आढळल्यास तर सदर प्रकल्पाचे अनुदान तात्काळ बंद करण्यात येईल तसेच यापुर्वी वितरीत अनुदानाची प्रकल्पाकडून व्याजासह भरपाई करण्यात येईल.

४. वस्त्रोद्योग प्रकल्पांनी दक्षता व नियंत्रण पथकास तपासणी वेळी सर्व कागदपत्रे उपलब्ध करून देण्याची जबाबदारी संबंधित प्रकल्पाची राहील, यासाठी प्रकल्पांना आगाऊ सुचना देण्यात येईल.

५. वस्त्रोद्योग प्रकल्पाने दक्षता व नियंत्रण पथकास कागदपत्रे तसेच अन्य माहिती उपलब्ध करून दिली नाही अथवा तपासणी दरम्यान सहकार्य केले नाही तर सदर प्रकल्पाचे सध्या सुरू असलेले सर्व अनुदान पुढील तपासणी पुर्ण होऊन त्याबाबत अंतिम निर्णय होईपर्यंत बंद करण्यात येईल.

६. दक्षता पथकाने मोठ्या प्रकल्पांची तपासणी दक्षता व निरीक्षण पथक नियंत्रकांच्या निरीक्षणाखाली करावी. तसेच अन्य प्रकल्पांची तपासणी पथक नियंत्रकांच्या निर्देशानुसार अथावा त्यांच्या निरीक्षणाखाली करावी.

७. दक्षता पथकाने दर महिन्याला किमान ३० प्रकल्पांची प्रकल्पांची तपासणी करावी.

८. दक्षता व नियंत्रण पथकास लवकरात लवकर सर्व प्रकल्पांची तपासणी करण्याची जबाबदारी सोपविण्यात येत आहे.

९. दक्षता पथक वस्त्रोद्योग प्रकल्पाची तपासणी करताना सदर वस्त्रोद्योग प्रकल्प वस्त्रोद्योग धोरणा अंतर्गत निर्गमित केलेल्या सर्व शासन निर्णयांची पुर्तता करत आहे किंवा कसे, याची तपासणी करेल.

१०. दक्षता पथकाने वरील प्रमाणे प्रकल्पाची सखोल तपासणी केल्यावर, संबंधित प्रकल्पास मान्यता देण्यात यावी अथवा अनुदान बंद करण्यात यावे. याबाबतचा अहवाल त्यांच्या शिफारशीसह मा. सचिव (वस्त्रोद्योग), यांना सादर करावा.

११. वरील प्रमाणे तपासणी पथकाने विहित कालमर्यादेत सर्व वस्त्रोद्योग प्रकल्पांची तपासणी पुर्ण करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२०४१६३९५५०९०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vishal Vishvas Madane

Digitally signed by Vishal Vishvas Madane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co Operation Marketing and Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bb0ed28a897fc87f69fe8807b3d9428966ce3233edb83a20c38834c19f2e3793, serialNumber=cb16db1cc002e115b709a8ca348a6483883493aaf53b7be25836cda1b57ff2dc, cn=Vishal Vishvas Madane
Date: 2019.12.04 16:43:48 +05'30'

**( विशाल मदने )**

**अवर सचिव ,महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
२. आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर.
३. सह सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
४. राज्य शासनाच्या वस्त्रोद्योग धोरणाअंतर्गत नोंदणी झालेल्या सर्व बँका
५. सर्व वस्त्रोद्योग प्रकल्प
६. निवड नस्ती (टेक्स-५)